स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजनेचे राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानात रुपांतर व अंमलबजावणी - मार्गदर्शक सूचना.
(Non Intensive NRLM-Guidelines )

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन परिपत्रक, क्रमांक. एनआरएलएम-२०१२/प्र.क्र. २५८/योजना ३,
मंत्रालय, मुंबई ४०००३२. दिनांक १. नोव्हेंबर, २०१२.

वाचा: शासन निर्णय, क्रमांक. एनआरएलएम - २०११/प्र.क्र.१९६/योजना-३, दिनांक १८ जुलै,२०११.

**प्रास्ताविक :**

केंद्र शासनाच्या ग्रामविकास विभागाने गरीबांचे दारिद्रय कमी करून त्यांचे जीवनमान उंचाविण्यासाठी १९७८ मध्ये प्रथम **एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रमाची** (IRDP) अंमलबजावणी केली. कालांतराने ड्वाक्रा, सिट्रा, ट्रायसेम तसेच गंगा कल्याण योजना यासारख्या उपक्रमांचा समावेश करण्यात आला. त्यांनतर दारिद्रय निर्मुलनासाठी योजनेत सुधारणा करून १९९९ मध्ये कौशल्य वृध्दी, पतकर्ज व अर्थसहाय्य च्याआधारावर **स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना** सुरू करण्यात आली. या योजनेची अंमलबजावणी करताना सर्व गरीब कुटूंबांना सहभागी करून घेतले नव्हते, गरीबांचे स्वंयसहाय्यता गटांची स्थापनेनंतर त्यांची क्षमतावृध्दी, गटबांधणी, योग्य प्रमाणात पतपुरवठा, उत्पादनासाठी योग्य बाजारपेठ, विपणनासाठी पायाभूत सुविधा निर्माण करण्यासाठी बराच वाव असल्याचे केंद्र शासनाच्या निदर्शनास आल्यामुळे गरीबांचे निर्मुलन करण्यासाठी नवीन धोरण निश्चित करण्यासाठी **प्राध्यापक आर. राधाकृष्ण समितीची स्थापना** केली. या समितीच्या शिफारशी विचारात घेऊन सन २०११ मध्ये **राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान** (National Rural Livelihoods Mission) सुरू करण्याचा निर्णय घेण्यात आला. या अभियानात **गरीबांच्या स्वयंसहाय्यता गटांचे संघटन करून त्याव्दारे स्वयंरोजगार मिळविणे** हा मुलभूत घटक मानण्यात आला आहे. गरीबांच्या **संस्था आणि संघाच्या** उत्पादन वाढीसाठी उच्च दर्जाच्या आधारभुत सेवा पुरविणे, बाजारपेठांची जोडणी करणे, तसेच जोखीम व्यवस्थापन करणे या बाबी सुध्दा अंतर्भुत आहेत. स्वरोजगारीचे आरोग्य व आहाराच्या संदर्भात सुध्दा या योजनेत विचार करण्यात आला असून त्यांची सामाजिक सुरक्षा/विमा किंवा तत्सम पर्यायाचा विचार करण्यात आलेला आहे. राज्य स्तरापासून जिल्हा, तालुका, व गावस्तरापर्यंत दारिद्रय निर्मुलनासाठी स्वतंत्र व व्यावसायिक मनुष्य बळ निर्माण करण्याची तरतूद या योजनेत केलेली असल्याने दारिद्रय निर्मुलनाचे उदिष्ट साध्य करता येईल असे अपेक्षित आहे.

दिनांक १८ जुलै,२०११ शासन निर्णयाव्दारे महाराष्ट्र राज्याने दारिद्रय निर्मुलनासाठी केंद्र पुरस्कृत राज्य- ग्रामीण जीवनोन्नती अभियानाची अंमलबजावणी करण्याचा निर्णय घेतला आहे. उपरोक्त शासन निर्णयातील मुद्दा क्रमांक १ ते ४ नुसार हे अभियान प्राधान्याने अधिक संवेदनशील जिल्हे, तालुके व ग्रामपंचायतीमध्ये राबविण्यात येत आहे. यामध्ये राज्यातील **पहिल्या टप्प्यात ठाणे, रत्नागिरी, सोलापूर , नंदूरबार, जालना, उस्मानाबाद, यवतमाळ, वर्धा, गोंदिया व गडचिरोली अशा दहा जिल्हयातील ३६ तालूक्यामध्ये इंटेन्सिव अभियान राबविण्यात येत आहे.** या पहिल्या इंटेन्सिव टप्प्यासोबतच **राज्यातील ३३ जिल्हयामधील उर्वरीत सर्व तालुक्यात नॉन-इंटेन्सिव अभियानाची अंमलबजावणी** करण्यात येणार आहे. इंटेन्सिव अभियान मध्ये वरील ३६ तालुक्यात प्रथम गावांची निवड करून त्या गावामध्ये गरीबांच्या बचत गटांची पुनर्बांधणी करून त्याचे संघ तयार करणे व कौशल्यवृध्दी करून स्वयंरोजगाराच्या संधी निर्माण करण्यात येणार आहेत. **नॉन-इंटेन्सिव ३३ जिल्हयात** लक्ष केंद्रीत करून भविष्यात **इंटेन्सिव अभियानामध्ये समाविष्ट करण्यासाठी पूर्वपिठिका आणि त्यासाठी पोषक वातावरण निर्माण करण्यावर भर** देण्यात येईल. यासाठी खालील प्रमाणे " **मार्गदर्शक सुचना** " निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक :-**

राज्यातील सर्व **गरीब कुटूंबापर्यंत पोहचून त्यांना कायम स्वरूपी उपजिविकेच्या संधी उपलब्ध करणे व गरीबीच्या बाहेर येईपर्यंत त्यांना मदतीचा हात देऊन त्यांचे जीवनमान उंचविण्यासाठी सर्वतोपरी मदत करणे** हा या अभियानाचा उद्देश आहे.

त्यामुळे राज्यातील ३३ जिल्हयांमधील उर्वरित सर्व तालुक्यांमध्ये **'नॉन-इंटेंसिव्ह'** NRLMची अंमलबजावणी करण्याबाबत मार्गदर्शक सूचना खालीलप्रमाणे निर्गमित करण्यात येत आहेत:-

**१. अभियानाची अंमलबजावणी यंत्रणा:-**

जिल्हास्तरावर जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (DRDA) ही अंमलबजावणी यंत्रणा म्हणून काम करील. तसेच SGSY च्या अंमलबजावणीसाठी जिल्हा स्तरावर उपलब्ध असलेल्या कक्षातील मनुष्यबळाचा उपयोग करुन त्यांची क्षमतावृध्दी करुन **नॉन-इंटेंसिव्ह (Non-Intensive)** NRLM राज्यामध्ये राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यासाठी जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा (DRDA) चे बळकटीकरण व सक्षमीकरण करणे आवश्यक असल्याने खालील कार्यवाही तात्काळ करण्यात यावी.

अ) जिल्हयातील सर्व सहा.प्रकल्प अधिकारी व विस्तार अधिकारी (उद्योग व एसजीएसवाय) तसेच तालुक्यातील सर्व विस्तार अधिकारी (उद्योग व एसजीएसवाय) यांच्या रिक्त जागा संबंधित विभागाने तात्काळ प्रतिनियुक्तीने भरण्यात याव्यात. या रिक्त जागा प्रतिनियुक्तीने हे शासना परिपत्रक निर्गमित केल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत संबंधित विभागाने रिक्त जागा भरल्या नाहीत तर विहीत प्रक्रियेचा अवलंब करुन करार पध्दतीने पुढील महिनाअखेर रिक्त जागा भरण्यात याव्यात. करार पध्दतीने भरलेली **पदे मानधन तत्वावर निव्वळ करार पध्दतीने भरण्यात येत असल्यामुळे ते कधीच कोणत्याही नियमित शासकीय पदावर नियुक्तीसाठी हक्कदार होणार नाहीत.**

ब) नॉन – इंटेंसिव्ह (Non-Intensive) अभियानांतर्गत कार्यरत विस्तार अधिकारी (SGSY व उदयोग) यांचे दिनांक १ एप्रिल २०१२ पासूनची वेतन व भत्ते **संस्था बांधणी / क्षमता बांधणी व प्रशिक्षण या शीर्षाखाली** अदा करण्यात यावेत. मात्र सहाय्यक प्रकल्प अधिकारी यांचे वेतन व भत्ते पुर्वीप्रमाणेच त्यांच्या मूळ आस्थापनेवरुनच काढण्यात यावेत.

**२. नियतव्यय मंजूर करणे, अनुदान वाटप करणे व खर्च करण्याबाबत कार्यपध्दती :-**

राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान हे केंद्र पुरस्कृत अभियान असून यासाठी उपलब्ध निधीमध्ये केंद्र शासनाचा ७५% व राज्य शासनाचा २५% हिस्सा आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांन्वये राज्यास वार्षिक नियतव्यय प्राप्त होणार असून सर्व जिल्हयांना राज्य शासन व महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान यांच्या संयुक्त विदयमाने केंद्र व राज्य हिस्याचे नियतव्यय मंजूर करण्यात येईल. जिल्हयांना महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानामार्फत मंजूर नियतव्ययाचे वितरण दोन समान हप्त्यात करण्यात येईल.

सन २०१२-१३ या वर्षाकरीता फक्त केंद्र हिश्याचे वाटप अभियान कक्षामार्फत होईल व राज्य हिस्सा या पुर्वीच्या कार्यपध्दीतनुसार जिल्हा नियोजन मंडळामार्फत वितरीत करण्यात येईल. तथापि सन २०१३-१४ पासून केंद्र व राज्य हिस्सा अभियान कक्षामार्फतच जिल्हयांना वितरीत करण्यात येईल.

वरील योजनेचे नियमित अंतर्गत लेखापरिक्षण पथकामार्फत लेखापरिक्षण करण्यात येईल. या योजनेची अंमलबजावणी करतांना **अंतर्गत लेखा परिक्षण हे वित्तीय अनियमितता टाळण्यासाठी मार्गदर्शक असेल.** यासाठी संबंधित वरिष्ठ लेखाधिकारी / लेखाधिकारी जबाबदार असतील.

### ३. नॉन—इंटेंसिव्ह (Non-Intensive) अभियानांतर्गत खर्चाच्या बाबी:-

फिरता निधी, भांडवली / व्याज अनुदान, क्षमता बांधणी, पायाभूत सुविधा आणि प्रशासकिय खर्चाच्या बाबींचा तपशिल:-

| अ.क्र. | खर्चाच्या बाबीं | एनआरएलएम |
|---|---|---|
| १ | भांडवली अर्थ अनुदान / व्याज अनुदान | २५% |
| २ | फिरता निधी | २०% |
| ३ | संस्था बांधणी / क्षमता बांधणी | ३०% |
| ४ | पायाभूत सुविधा व विपणन | २०% |
| ५ | प्रशासकिय खर्च | ५% |

खर्चाच्या विगतवारीनुसार मुख्य कार्यकारी अधिकारी तथा जिल्हा अभियान संचालक यांनी जिल्हयाचा वास्तवदर्शी आराखडा तयार करुन जिल्हा स्तरीय नियंत्रण समितीच्या मान्यतेने अंमलात आणावा.

ब) अनुदानाच्या बाबींचा तपशिल:-

| अ.क्र. | अनुदानाच्या बाबी | किमान मर्यादा | कमाल मर्यादा | ठळक बाबी |
|---|---|---|---|---|
| १ | फिरता निधी | रु. १० हजार | रु.१५ हजार | पंचसूत्रीच्या आधारे प्रथम श्रेणीकरणानंतर पात्र गटांना बचतीच्या प्रमाणात विहित मर्यादेत देय. |
| २ | भांडवली अनुदान प्रती स्वरोजगारी | रु.१५ हजार (सर्वसाधारण) | रु. २० हजार (अनु.जाती/ जमाती) | अनु.जाती/जमाती ५०%, अल्पसंख्यांक १५%, अपंग-३% या प्रमाणात देय. |
| | स्वयंसहाय्यता गट | किमान मर्यादा नाही. | रु २.५० लक्ष | किमान दुसरी श्रेणी पूर्ण केलेल्या व किमान ७०% BPL सदस्यांच्या गटाला नियमित कर्जफेडीच्या प्रमाणात देय. |
| ३ | व्याज अनुदान | | रु.१ लक्ष / प्रती कुटुंब कर्ज रकमेपर्यंत | बँकदर आणि ४% यांमधील तफावती एवढे अनुदान कर्जाच्या नियमित परतफेडीनंतर दर सहामाहीस देय |
| ४ | प्रशिक्षण निधी | | रु.७५०० / प्रती स्वरोजगारी | प्रशिक्षण किमान ३० दिवसांचे अपेक्षित असून रु. २५० प्रतिदीन प्रतिस्वरोजगारी खर्च अपेक्षित आहे. |

उपरोक्त सर्व अनुदान अनुसूचित जाती अनुसुचित जमाती ५०%, महिला ४०% अल्पसंख्याकांसाठी १५% व अपंगांसाठी ३% या प्रमाणे खर्च करावे.

### ४. संस्था बांधणी:-

SGSY योजनेंतर्गत यापुर्वी मोठया प्रमाणावर स्वयंसहाय्यता गटांची निर्मिती करण्यात आली असून गटांचे बळकटीकरण करण्यास खूप मोठा वाव आहे. त्यासाठी अस्तित्वात असलेल्या स्वयंसहाय्यता गटांच्या बळकटीकरणाचा कार्यक्रम प्राधान्याने हाती घेण्यात यावा. यासाठी जिल्हयातील अस्तीत्वात असलेल्या गटांची विभागणी तीन विभागात करण्यात यावी.

**१) सुरु असलेले गट:-** सुरु असलेल्या गटांना तालुकास्तरीय यंत्रणेने नियमित भेटी देऊन पंचसूत्रीचा अवलंब करण्यासाठी प्रोत्साहित करावे. पंचसूत्री खाली दिलेली आहे.

- नियमित बैठका घेणे.

- नियमित बचत करणे.
- अंतर्गत कर्जाचे वाटप करणे.
- नियमित कर्जाची परतफेड करणे.
- लेखा पुस्तके अद्ययावत ठेवणे.

२) **अनियमित असलेले गट** :- अनियमित असलेल्या गटांचे वेगळयाने प्रशिक्षण घेऊन अनियमित असल्याबाबतची कारणे जाणून घेऊन गटातील अंतर्गत वाद विवाद मिटविण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना करावी. अनियमित असलेले गट नियमीत करण्याचे प्रयत्न करावेत आणि पंचसुत्रीची अंमलबजावणी करुन गट प्रथम श्रेणीमध्ये आणण्यासाठी प्रयत्न करावेत.

३) **बंद पडलेले गट**:- बंद पडलेल्या गटांना पुनरुज्जीवित करण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना करावी बंद असलेले गट नियमीत करण्याचे प्रयत्न करावेत आणि पंचसुत्रीची अंमलबजावणी करुन गट प्रथम श्रेणीमध्ये आणण्यासाठी प्रयत्न करावेत. **यापुढे नवीन गट स्थापण्यासाठी कोणत्याही संस्थेस मानधन देय असणार नाही.**

गटांचे बळकटीकरण व पंचसूत्रीचा अवलंब करण्यासाठी अस्तीत्वात असलेल्या व यशस्वीपणे कार्यरत असलेल्या गटातील सदस्य असलेल्या महिलांची समुह साधन व्यक्ती (CRP) म्हणून निवड करावी. त्यांना प्रशिक्षित करुन त्यांचा सहभाग नविन गट निर्मित तसेच अस्तित्वात असलेल्या गटांच्या क्षमता बांधणीसाठी करावा. या कामी भारत निर्माण सेवकांचा सहभाग घेण्यात यावा. **सद्य:स्थितीत नवीन स्वयंसहायता गट किंवा ग्राम / तालुका संघ स्थापन करण्यात येऊ नयेत.**

५. **यंत्रणेची क्षमता बांधणी आणि प्रशिक्षण:-**

**क्षमता बांधणी व प्रशिक्षण हा नॉन-इंटेंसिव्ह NRLM अभियानाचा गाभा आहे.** विविध संस्थांचे आणि यंत्रणेचे बळकटीकरण करणे याद्वारे शक्य होणार आहे. या अभियानात प्रथमच **अंमलबजावणी करणारी यंत्रणा व समुदाय** या दोन्ही घटकांच्या क्षमता बांधणीची गरजेप्रमाणे आवश्यक ती कार्यवाही करण्यात येणार आहे. या कार्यक्रमांतर्गत मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी .

i. प्रकल्प संचालक, सहाय्यक प्रकल्प अधिकारी, गट विकास अधिकारी आणि तालुका समन्वयक, क्लस्टर प्रमुख, भारत निर्माण सेवक, यांची प्रशिक्षणाद्वारे क्षमता बांधणी करण्यात यावी.
ii. बँकेचे राज्यस्तरापासून ब्रँच स्तरापर्यंतच्या अधिकारी/ मॅनेजर यांच्या प्रशिक्षण गरजा ओळखून त्यांना प्रशिक्षण देण्यात यावे.
iii. NGOs, CSOs व प्रेरक यांचेसाठी प्रशिक्षण कार्यशाळेचे आयोजन करण्यात यावे. पंचायत राज संस्थांच्या पदाधिकाऱ्यांसाठी उद्बोधन कार्यशाळेचे आयोजन करण्यात यावे.
iv. उत्कृष्ट काम केलेल्या राज्याबाहेरील /राज्यातील **इंटेंसिव्ह गटातील गावांना /बँकांना /स्वयंसहायता गट / संघाच्या भेटीचे कार्यक्रम** निश्चित करुन अभ्यास दौरे आयोजित करावेत.
v. प्राथमिक कालावधीत असे अभ्यास दौरे प्रामुख्याने आंध्रप्रदेश, बिहार, केरळ, तामिळनाडू या राज्यात आयोजित करण्यात यावेत.
vi. मुख्य कार्यकारी अधिकारी तथा जिल्हा अभियान संचालक यांनी राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाच्या सहकार्याने राज्या बाहेरील दौऱ्यांचे आयोजन करावे.
vii. मुख्य कार्यकारी अधिकारी, उप आयुक्त (आस्थापना / विकास) आणि राज्य/ विभागीय पातळीवरील अधिकारी/पदाधिकारी यांच्या क्षमताविकासासाठी आवश्यक प्रशिक्षण कार्यक्रम आयोजित करावेत.

६. **समुहाची क्षमता बांधणी आणि प्रशिक्षण :-**

स्वयंसहाय्यता गटांच्या क्षमता बांधणीचे विविध घटक असून त्यापैकी खालील घटकांना प्राधान्य देण्यात यावे.

i. पंचसूत्रीचा अवलंब करणे.
ii. गटाचे लेखे ठेवणे / बँकेचे व्यवहार व पतविषयक जाणीव-जागृती.
iii. सध्याच्या उत्पन्नाच्या स्त्रोतांचे बळकटीकरण करणे.
iv. लिंग भेद दूर करणे व कायदेविषयक बाबी.
v. कौशल्य वृध्दीद्वारे वेतनी रोजगार व स्वयंरोजगार.

vi. संनियंत्रणासाठी, लेख्यांची /दैनंदिन व्यवहारासाठी नवीन तंत्रज्ञानाचा वापर.
vii. संग्राम कक्षातील संगणकावर उत्पादनाचे दर पाहणे/ मार्केटींगसाठी माहिती घेणे.
viii. महिला व बालकांच्या आरोग्य व पोषणासाठी प्रशिक्षण.

तालुका समन्वयकांच्या मदतीने स्वयंसहाय्यता गटांच्या क्षमता बांधणीच्या विस्तृत आराखडा तयार करण्यात यावा. सक्षम NGOs. कृषि विद्यापिठ, कृषि महाविद्यालये, पशु वैद्यकीय महाविद्यालये, आरोग्य विज्ञान महाविद्यालये, गृह विज्ञान महाविद्यालये, तंत्रनिकेतन, औद्योगिक प्रशिक्षण संस्था (ITI), RSETI यांच्या मार्फत समुहाचो स्वयंसहायता गटातील सदस्य / स्वरोजगारी यांची क्षमता बांधणी आणि प्रशिक्षण आयोजित करावे.

पंचसूत्रीचा अवलंब करणे, लेखे ठेवणे / बँकेचे व्यवहार व पर्तविषयक जाणीव-जागृती मध्ये गावातील एखादा स्वयंसहायता गट सक्षम वाटत असेल तर अशा गटामार्फत सुध्दा गावातील इतर गटातील सदस्य / स्वरोजगारी यांना **मुलभूत क्षमतावृध्दी प्रशिक्षण** देण्यात यावे जेणेकरुन अर्धवट किंवा पूर्ण बंद असलेल्या गटांना पुनरुज्जीवीत करता येईल.

महिला व बालकांच्या आरोग्य व पोषणासाठी प्रशिक्षणासाठी राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान आणि युनिसेफ सारख्या आंतरराष्ट्रीय संस्थेसोबत समन्वय करुन प्रशिक्षण आणि क्षमतावृध्दीचे कार्यक्रम आयोजित करावेत.

## ७. आर्थिक समावेशन धोरण :-

महाराष्ट्रात नाबार्डच्या अहवालानुसार ग्रामीण भागात सुमारे ५ लाख स्वंयसहाय्यता गटांची स्थापना झालेली आहे. यामधील बहुतांश गटांना बँकाकडून विविध कारणांमुळे कर्ज पुरवठा होऊ शकला नाही. बँकांचा सहभाग वाढविण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

### अ) स्वंयसहाय्यता गटांची बँकांशी संलग्नता :-

बँकांनी पंचसुत्रीच्या आधारावर श्रेणीकरण झालेल्या स्वंयसहाय्यता गटांना फिरता निधी आणि अर्थ सहाय्य देऊन बँकांशी संलग्न करणे आवश्यक आहे. गटांना मोठया स्वरूपाचे कर्ज देण्यापुर्वी लहान लहान कर्ज उपलब्ध करून देणे आणि त्या गटाची आर्थिक क्षमता विकास करण्यासाठी मदत करणे आणि स्वंयसहाय्यता गटांना सर्वोच्च प्राधान्याने कर्ज पुरवठा करणे हे भारतीय रिझर्व बँकेचे धोरण आहे.

रिझर्व बँक ऑफ इंडिया (RBI) चे परीपत्रक--Master Circular on SHG- Bank Linkage Programme (परिशिष्ट १) नुसार बँकांनी गटांना कर्ज मंजूर करण्याकरीता कार्यवाही करणे आवश्यक आहे. ह्याबाबत असे निर्देश दिलेले आहे. वरील परिपत्रकातील खालील महत्वाच्या मजकुराकडे लक्ष वेधण्यात येत आहे.

Banks have been advised to meet the entire credit requirements of SHG members, as envisaged in the Paragraph 93 of the Union Budget announcement made by the Honourable Finance Minister for the year 2008-09 where in it was stated as under:

**Banks will be encouraged to embrace the concept of Total Financial Inclusion. Government will request all scheduled commercial banks to follow the example set by some public sector banks and meet the entire credit requirements of SHG members, namely, (a) income generation activities, (b) social needs like housing, education, marriage, etc. and (c) debt swapping.**

कोणत्याही स्वंयसहाय्यता गटाच्या प्रथम मुल्यमापनानंतर पात्र ठरलेल्या स्वयंसहाय्यता गटाला फिरता निधी उपलब्ध करून दिला नसल्यास त्यांना बचतीच्या किमान चार पट ( १:४ ) रक्कम अर्थसहाय्य म्हणून उपलब्ध करून दयावी. तसेच ज्या स्वयंसहाय्यता समुहांना फिरता निधी दिलेला आहे. त्यांना त्यांची बचत व फिरता निधी यांच्या किमान तीन पट रक्कम ( १:३ ) कॅश क्रेडिटने उपलब्ध करून दयावी. जे स्वयंसहाय्यता गट कर्ज रकमेची परतफेड नियमितपणे करतील त्यांना त्यांची बचत व फिरता निधी यांच्या किमान चार पट रक्कम ( १ : ४ ) कॅश क्रेडिटमध्ये वाढ करून उपलब्ध करून दयावी.

### ब) फिरता निधी :-

फिरता निधी आणि बँकाचा पतपुरवठा करण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

i. जे गट पंचसूत्रीचा अवलंब करीत असतील अशा सर्व गटांना फिरता निधी देय राहील.

ii. या पुर्वी ज्या गटांना फिरता निधी मिळालेला आहे अशा गटांना नव्याने फिरता निधी देण्यात येऊ नये.

iii. फिरता निधी किमान रु. १०,००० व कमाल रु. १५,००० च्या मर्यादेत गटांना त्यांच्या बचतीच्या प्रमाणात देय राहील.

iv. फिरता निधी हा बँकाना न देता थेट स्वयंसहाय्यता गटांच्या बँक खात्यात धनादेशाद्वारे / इलेक्ट्रॉनिक ट्रान्सफरद्वारे वितरीत करण्यात यावा.

v. फिरता निधी मंजूर करण्याकरीता गटाने प्रथम श्रेणी (Gradation) पार करणे आवश्यक आहे.

vi. ग्रेडेशनसाठी पंचसुत्रीसह पुर्वीचेच निकष व प्रपत्र कायम ठेवण्यात यावे.

vii. Gradation करण्यासाठी बँक प्रतिनिधी व पंचायत समितीच्या अधिकाऱ्यासमवेत स्वयंसहाय्यता गटांच्या प्रतिनिधींचा समावेश करण्यात यावा.

viii. ज्या गटांना फिरता निधी मिळालेला आहे अशा सर्व गटांना बँकेकडून कॅश क्रेडिट लिमिट मंजूर करुन घ्यावी.

ix. ज्या गटांना कॅश क्रेडिट लिमिट मंजूर करण्यात आली आहे त्यांची मर्यादा १:३ व पुढे १:४ पर्यंत वाढविण्यासाठी बँककडे पाठपुरावा करावा.

x. बँकेने गटाची बचत क्षमता लक्षात घेऊन त्यांना योग्य वाटल्यास १:४ या प्रमाणापेक्षा जास्त कर्जपुरवठा करण्याचा निर्णय घेऊ शकतात, ही बाब भारतीय रिझर्व्ह बँकेने स्पष्ट केली आहे.

xi. **गटांनी वापरलेली कॅश क्रेडीट मर्यादा हा सर्व जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणांकरीता महत्वाचा Performance Indicator असणार आहे.**

**क) कर्ज व भांडवली / व्याज अनुदान :-**

i. राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत गटाला केवळ सामुहिक उदयोग/व्यवसाय सुरु करण्यासाठीच कर्जाची मागणी करण्याची अट राहणार नाही. या नवीन धोरणानुसार स्वयंसहायता गटातील व्यक्तीगत सदस्याला सुध्दा स्वतंत्र कर्ज घेऊन व्यवसाय सुरु करता येईल, अशी तरतूद केलेली आहे. तथापि, स्वयंसहायता गटाला कर्ज पुरवठा करण्यास प्राधान्य दिलेले आहे.

ii. वैयक्तिक स्वरोजगारींना भांडवली अनुदान सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु. १५,००० तर अनुसूचित जाती/जमाती प्रवर्गासाठी रु. २०,००० प्रमाणे देय राहील. स्वयंसहायता गटांना भांडवली अनुदानाची कमाल मर्यादा रु. २.५० लक्ष असेल. गटांना भांडवली अनुदानासाठी **किमान ७० टक्के सदस्य हे दारीद्रय रेषेखालील असणे बंधनकारक** आहे. गटातील व्यक्तीगत स्वरोजगरींना स्वतंत्रपणे व्यवसायासाठी कर्ज घ्यावयाचे असल्यास असे कर्ज घेता येईल.

iii. गट स्थापन झाल्यापासून किमान १२ महिने पूर्ण झालेले आहे आणि फिरता निधी मिळाल्यापासून किमान ६ महिने पूर्ण झालेले आहेत, गट दुसऱ्या श्रेणीसाठी पात्र झालेला आहे, तसेच गटाची कामगिरी समाधानकारक आहेत अशा गटांना कर्ज व अनुदान देय असेल. व्याज अनुदानाची आकारणी दर सहा महिन्याला करण्यात येईल.

iv. ज्या गटांना / वैयक्तिक स्वयंरोजगारींना यापूर्वी अनुदान / व्याज अनुदान मिळालेले असेल अशा गटांना / वैयक्तिक स्वयंरोजगारींना भांडवली अनुदान किंवा व्याज अनुदान देय असणार नाही.

v. प्रथम मुल्यमापनानंतर फिरत्या निधीचा योग्य उपयोग करून स्वयंरोजगार अथवा उदयोग व्यवसाय करण्यासाठी पात्र ठरलेले स्वयंसहाय्यता गट हे संयुक्त अर्थसहाय्य (मुदतीचे कर्ज अधिक खेळते भांडवल) (Composite Loan = Term loan + Working Capital) घेण्यास पात्र ठरतील त्यावेळी त्यांच्या समोर दोन पर्याय उपलब्ध करण्यात आलेले आहेत.

- **ज्या स्वयंसहाय्यता गटातील सदस्यला स्वतंत्रपणे वेगवेगळा स्वयंरोजगार अथवा उदयोग व्यवसाय सुरू करण्यासाठी कर्जाची आवश्यकता आहे** अशा स्वयंसहाय्यता गटाला आपल्या गटाचा सुक्ष्म गुंतवणुक आराखडा (Micro Investmment Plan) तयार करावा लागेल. बँकेने अशा मंजूर आराखडयानुसार (MIP) त्या स्वयंसहाय्यता गटाच्या आवश्यकतेनुसार त्यांच्या कॅश क्रेडिटमध्ये वाढ करून अर्थसहाय्य मंजूर करावे. अशा प्रकरणांमध्ये नियमानुसार व्याज अनुदान (Interest Subsidy) अनुज्ञेय राहील तथापि भांडवली अनुदान (Capital Subsidy) देय असणार नाही.
- **ज्या स्वयंसहाय्यता गटाला अथवा गटाच्या सदस्यांना स्वयंरोजगार अथवा उदयोग व्यवसायासाठी मुदत कर्ज /संयुक्त कर्जाची आवश्यकता आहे** व त्या स्वयंसहाय्यता गटाने त्या

**उदयोग व्यवसायासाठी प्रकल्प प्रस्ताव** सादर केला आहे अशा स्वयंसहाय्यता गटाला बँक त्यांच्या मंजूर प्रकल्प मुल्याएवढे कर्ज मंजूर करील. अशा परिस्थितीत स्वयंसहाय्यता गटांना त्यांना मंजूर झालेल्या कर्जाच्या प्रमाणात भांडवली अनुदान किंवा व्याज अनुदान या पैकी एक देय राहील.

vi. कर्जाची कमाल मर्यादा प्रकल्पाच्या गरजेनुसार ठरवण्यिात यावी. आणि प्रकल्पासाठी आवश्यक असणारे अर्थसहाय्य मंजूर झाल्यानंतर गटास /स्वयंरोजगारीस आवश्यकतेप्रमाणे एका पेक्षा अधिक वेळा वाटप करण्यात यावे. बँकेच्या अर्थसहाय्याच्या वाटपाच्या प्रमाणात भांडवली अनुदानाचे वितरण करावे.

vii. वैयक्ति स्वयंरोजगारींना भांडवली अनुदान देताना हे अनुदान अत्यंत अपवादात्मक परिस्थितीत देण्यात यावे. असे अनुदान वितरीत करण्यापूर्वी संबंधितांनी त्या ठिकाणी गट स्थापन करणे शक्य होणार नाही असे प्रमाणित करावे.

viii. गटाच्या व्यवसायासाठी लागणारे साहित्य, साधन-सामुग्री त्याच गटाला खरेदी करण्याचा अधिकार असेल.

## ८. क्लस्टर स्तरावर सुक्ष्म उदयोग निर्मिती:-

दारिद्रय रेषेखालील कुटुंबांना / समुहाला गरिबीतून वर आणण्यासाठी सामूहीक स्वरुपाचे व्यवसाय निर्माण केल्यास त्यांच्या उत्पादनासाठी लागणारी विपणन व्यवस्था आणि अनुषंगिक पाठबळ सहजतेने उपलब्ध होऊन त्यांच्या उत्पन्नात कायम स्वरुपी वाढ होऊ शकते. म्हणून केंद्र शासनाने स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनेत सुध्दा ॲक्टीव्हीटी क्लस्टरची संकल्पना अंमलात आणण्यासाठी निर्देशित केलेले होते. तथापि, या संकल्पनेला म्हणावे तेवढे महत्व देण्यात आले नव्हते. **नवीन धोरणामध्ये ॲक्टीव्हीटी क्लस्टरची संकल्पनेला अनन्य साधारण महत्व दिलेले आहे.**

नवीन धोरणातील महत्वाचे घटक खालीलप्रमाणे आहेत :-

i. प्रत्येक जिल्हयाकरीता निवडक व्यवसाय आणि त्या व्यवसायाचे क्षेत्र (Activity Clusters) निश्चित करण्यात यावेत. शक्यतो प्रत्येक तालुक्यात एक किंवा दोन क्लस्टर निवडून त्यामध्ये योग्य उदयोग-व्यवसायाठी विस्तृत प्रकल्प अहवाल तयार करावा.

ii. सर्वसाधारणत: प्रत्येक क्लस्टरमध्ये सर्वसाधारणपणे २०० स्वरोजगारी सहभागी होऊ शकतील अशा पध्दतीने नियोजन करावे. Activity Clusters निहाय प्रत्येक प्रकल्पाचा प्रकल्पअहवाल तयार करण्यात यावा.

iii. प्रकल्प अहवाल तयार करताना त्यामध्ये सारांशाने प्रास्ताविक, लक्ष्य गट, SWOT विश्लेषण, उद्दिष्ट गट (ज्यामध्ये वैयक्तिक स्वरोजगारींचे प्रमाण १० टक्क्यांपेक्षा अधिक असणार नाही ), गट- केंद्रीत कार्यपध्दती, Forward Backward Linkages, आर्थिक स्थिती, प्रशिक्षण व क्षमता बांधणी, पायाभूत सुविधा व विपणन आणि गरजेप्रमाणे पुरविलेली मदत या बाबींचा समावेश असावा.

iv. बँकांनी प्रकल्प आराखडयातील युनीट कॉस्टप्रमाणे संयुक्त कर्ज (कॉम्पोझीट लोन) मंजूर करावे आणि कर्जाचे वाटप करीत असताना पारदर्शकता राहील याची विशेष काळजी घ्यावी.

v. कर्जाचे वाटप केल्यानंतर त्यांच्या निर्माण होणाऱ्या मत्तांचीही तपासणी करावी.

## ९. पायाभूत सुविधा आणि विपणन:-

i. निवडलेल्या ॲक्टिव्हिटी क्लस्टरमध्ये करण्यात येणाऱ्या मुलभूत सुविधेचा प्रकल्प कृती आराखडा सक्षम प्राधिकरणाने मंजूर करावा. स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजने अंतर्गत ३१.३.२०१२ पूर्वी सुरु असलेल्या अपूर्ण कामांवर मुलभूत सुविधेतून कामे पूर्ण करण्यासाठी खर्च करण्यात यावा. ३१.३.२०१२ अखेर जी कामे सुरु झालेली नाहीत ती कामे रद्द करावीत.

ii. निवडलेल्या **ॲक्टिव्हीटी क्लस्टरचा** जिल्ह्याचा एकत्रित प्रस्ताव तयार करीत असताना या क्लस्टरमध्ये आवश्यक असणाऱ्या मुलभूत सुविधांचासुध्दा समावेश करावा.

iii. मुलभूत सुविधेवरील खर्च हा पायाभूत सुविधा व विपणन या लेखाशिर्षामधून भागविण्यात यावा.

iv. उत्पादीत मालाची विक्री करण्यासाठी देशांतर्गत विविध राज्यातील व स्वराज्यातील सरस/विक्री प्रदर्शनासाठी प्रचलित मर्यादेत खर्च करण्यात यावा. यासाठी प्रत्येक जिल्ह्याने/ विभागाने पुर्ण वर्षाचे नियोजन करावे व आवश्यकते प्रमाणे सक्षम प्राधिकरणाची मान्यता घ्यावी.

## १०. कौशल्य आणि रोजगार निर्मिती :-

ग्रामीण भागातील प्रत्येक कुटुंबासाठी **'एक कुटुंब-एक नोकरी'** निर्माण करणारी कौशल्ये विकसित करण्याचे शासनाचे धोरण आहे. यामधून संपूर्ण कुटुंब दारिद्रय रेषेबाहेर आणण्यासाठी हातभार लागु शकेल या उद्देशाने या योजनेत **कौशल्य विकास** या घटकावर भर देण्यात आलेला आहे. यासाठी ग्रामीण भागातील बेरोजगार युवक व युवकांमधील विकसित करावयाची कौशल्ये यांचा शोध घेण्यात यावा. जिल्ह्यातील **इंडस्ट्री असोशिएशन, चेंबर ऑफ कॉमर्स** तसेच इतर कौशल्य विकास आणि वेतनी रोजगार उपलब्ध करुन देणाऱ्या संस्था यांच्याशी विचारविनिमय करुन रोजगार निर्मितीच्या संधींचा शोध घेण्यात यावा व त्यानुसार रोजगार निर्मितीचे जिल्ह्यात लघुप्रकल्प तयार करावेत.

i. एका प्रकल्पात स्थानिक इच्छुक व लायक दारीद्रय रेषेखालील युवकांना वेतनी रोजगारासाठी प्रशिक्षण दयावे.

ii. ज्यांच्याकडे किमान पायाभुत प्रशिक्षण सुविधा आहेत, असे प्रशिक्षक आणि प्रशिक्षकांच्या संस्था (जसे आयटीआय, अभियांत्रिकी महाविदयालये, नर्सिंग महाविदयालये, केव्हीके, शेतकी महाविदयालये व पॉलिटेक्नीक महाविदयालये, नामांकित शासनमान्य संगणक प्रशिक्षण संस्था) आणि NGOs यांची सक्षम प्राधिकरणा द्वारे निवड करावी.

iii. गरजेनुसार प्रशिक्षणासाठी आर-सेटीचा उपयोग करण्यात यावा.

iv. कौशल्यवृध्दीद्वारे वेतनी रोजगार उपलब्ध होण्यासाठी विशेष प्रकल्पाची छाननी करुन सक्षम प्राधिकरणाची मान्यता घ्यावी.

v. मोठे उद्योजक ज्यांना १८ ते ३५ वयोगटातील तरुण वर्गाची विशिष्ट कौशल्याच्या कामासाठी आवश्यकता आहे अशा उद्योजकांशी संपर्क करुन त्यांना अशा मुळात कौशल्य असलेल्या तरुण व्यक्तींच्या सरळ मुलाखती घेण्यासाठी निमंत्रित करावे.

vi. प्रत्येक गाव निहाय दारिद्रय रेषेखालील कुटूंबातील १८ ते ३५ वयोगटातील तरूण बेरोजगारांची नोंद वही ठेवून त्यामध्ये त्यांचे नांव, दारिद्रय रेषा यादीतील क्रमांक, वय मुळात असलेले कौशल्य किंवा ज्या क्षेत्रात आवड आहे त्या क्षेत्राचे नांव आणि इतर अनुषंगिक माहिती असावी.

vii. सरळ निवडीसाठी घेण्यात येणाऱ्या मुलाखतीपूर्वी दारिद्रय रेषेखालील तरुणांना ४ ते ५ दिवसांचे व्यक्तिमत्व विकास, संवाद कौशल्य आणि इतर मुलाखत पूर्व प्रशिक्षण देऊन त्यांना **सरळ वेतनी रोजगारासाठी घेण्यात येणाऱ्या** मुलाखतीसाठी पाठवावे.

## ११. संनियंत्रण व मुल्यमापन

अभियानाच्या उपयुक्ततेसाठी व यशस्वीतेसाठी सातत्यपूर्वक संनियंत्रण आणि मुल्यमापन अत्यावश्यक आहे. याद्वारे मिळालेल्या अनुभवांच्या आधारे सकारात्मक बदल घडवुन आणता येतील, ज्यामुळे अभियानाची फलश्रृती वाढण्यास मदत होईल. या कार्यक्रमाची अंमलबजावणी करताना स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनेंतर्गत जिल्हा, तालुका आणि ग्रामपंचायत स्तरावर निर्माण करण्यात आलेल्या सर्व समित्या पुर्वीप्रमाणेच कार्यरत राहतील आणि त्यांना पूर्वी नेमून दिल्याप्रमाणे काम करतील. तथापि त्यांची कार्यकक्षा स्वर्ण जयंती ग्राम स्वरोजगार योजनेऐवजी राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियान ही असेल. विभागीय आयुक्त स्तरावर उपायुक्त (विकास) यांच्या मार्फत सुध्दा संनियंत्रण करण्यात येईल. यासाठी आवश्यक साधन सुविधा राज्य ग्रामीण जीवन्नोन्ती अभियाना मार्फत उपलब्ध करुन देण्यात येईल.

## १२. प्रशासन

राष्ट्रीय ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत प्रभावी अंमलबजावणीकरण्याकरीता ५% रक्कम प्रशासकीय खर्चासाठी उपलब्ध करुन देण्यात आली आहे. या रकमेचा विनियोग जिल्हा व तालुकास्तरीय अभियान कक्ष अदययावत करण्यासाठी करण्यात यावा. अभियान कक्षासाठी लागणारे संगणक, स्टेशनरी, कपाट-फर्निचरसाठी व गरजेनुसार वाहन व्यवस्था इत्यादी अनुषंगिक बाबींवर खर्च करता येईल.

उपरोक्त प्रमाणे सर्व शिर्षांतर्गत तरतुदींच्या खर्चाबाबतचे सविस्तर नियोजन करुन त्याचा वार्षिक कृती आराखडयात समावेश करण्यात यावा. व त्याला जिल्हा स्तरीय नियंत्रण समितीची मान्यता घेण्यात यावी. अभियानाच्या फलनिष्पत्तीचा नियमित आढावा कार्यकारी समितीच्या सभेमध्ये घेण्यात यावा.

अभियानांतर्गत होणाऱ्या मासिक खर्चाचा अहवाल दरमहाच्या ३ तारखेपर्यंत राज्यस्तरीय अभियान कक्ष व एकात्मिक ग्रामीण विकास कक्ष विहित प्रपत्रात सादर करावेत. तसेच जिल्हा स्तरावर उपलब्ध निधीपैकी ६०% खर्च झाल्यास पुढील हप्त्याची मागणी उपयोगिता प्रमाणपत्रासह राज्य अभियान कक्षाकडे करण्यात यावी. तसेच अभियानाचे अधिकृत लेखापरीक्षकांकडून नियमित लेखापरीक्षण करुन घ्यावे व त्याचा अहवाल राज्य अभियान कक्षास सादर करावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www. maharashtra.gov.in वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. [illegible] असा आहे.

(एस. एस. संधू)
प्रधान सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव,
सचिव, नियोजन/वित्त / सामाजिक न्याय/ आदिवासी विकास/महिला व बाल कल्याण/ सहकार/कृषि व पदुम/उद्योग, उर्जा व कामगार/ आरोग्य/ शालेय शिक्षण/ उच्च व तंत्र शिक्षण/ रोजगार व स्वयंरोजगार, मंत्रालय, मुंबई.
महासंचालक, राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य व पोषण मिशन, संचालक, NRHM
महालेखापाल (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर (५ प्रतींसह)
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर (५ प्रतींसह)
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, गृहनिर्माण भवन, बांद्रा(प.), मुंबई.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व उप आयुक्त (आस्थापना / विकास), विभागीय आयुक्त यांचे कार्यालय,
सर्व प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा,
गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
संचालक युनिसेफ/SIRD, पुणे
जनरल मॅनेजर व निमंत्रक, राज्य अग्रणी बँक, बँक ऑफ महाराष्ट्र, पुणे.
आयुक्त, इन्स्टीटयुशनल फायनन्स/ पाणलोट/ महिला व बाल विकास समिती.
अध्यक्ष, नाबार्ड, बांद्रा (पूर्व), मुंबई.
निवडनस्ती

RBI/2012-13/87

RPCD. FID. BC.No. 04 / 12.01.033/ 2012-13

July 02, 2012

The Chairman/ Managing Director/
Chief Executive Officer
All Scheduled Commercial Banks
Dear Sir,

**Master Circular on SHG-Bank Linkage Programme**

The Reserve Bank of India has, from time to time, issued a number of guidelines/instructions to banks on SHG-Bank Linkage Programme. In order to enable the banks to have instructions at one place, a Master Circular incorporating the existing guidelines/instructions on the subject has been updated and enclosed. This Master Circular consolidates and updates the circulars issued by Reserve Bank on the subject up to June 30, 2012 as indicated in the Appendix.

Yours faithfully

(C.D. Srinivasan)
Chief General Manager
Encl: As above

Rural Planning & Credit Department Central Office, 10th Floor, Central Office Building, post box no. 10014 Mumbai - 400001

Tel No: 91-22-22661602 Fax No: 91-22-22621011/22610948/22610943 Email ID:cgmicrpcd@rbi.org.in

# Master Circular on SHG-Bank Linkage Programme

1. Despite the vast expansion of the formal credit system in the country, the dependence of the rural poor on moneylenders somehow continued in many areas, especially for meeting emergent requirements. Such dependence was pronounced in the case of marginal farmers, landless labourers, petty traders and rural artisans belonging to socially and economically backward classes and tribes whose propensity to save is limited or too small to be mopped up by the banks. For various reasons, credit to these sections of the population had not been institutionalized. The studies conducted by NABARD, APRACA and ILO on the informal groups promoted by Non-Governmental Organizations (NGOs) brought out that Self-Help Savings and Credit Groups had the potential to bring together the formal banking structure and the rural poor for mutual benefit and that their working had been encouraging.

2. Accordingly, NABARD launched a pilot project to cover Self-Help Groups (SHGs) promoted by Non-Governmental Organizations, banks and other agencies under the pilot project and supported it by way of refinance. The quick studies conducted by NABARD in a few states to assess the impact of the linkage project brought out encouraging and positive features like increase in loan volume of the SHGs, definite shift in the loaning pattern of the members from non-income generating activities to production activities, nearly 100% recovery performance, significant reduction in the transaction costs for both the banks and the borrowers etc, besides leading to gradual increase in the income level of the SHG members. Another significant feature observed in the linkage project was that about 85% of the groups linked with the banks were formed exclusively by women.

3. With a view to studying the functioning of SHGs and NGOs for expanding their activities and deepening their role in the rural sector, in November 1994, RBI constituted a working Group comprising eminent NGO functionaries, academicians, consultants and bankers under the Chairmanship of Shri S.K. Kalia, the then Managing Director, NABARD. The Working Group was of the view

that the linking of SHGs with the banks is a cost effective, transparent and flexible approach to improve the accessibility of credit from the formal banking system to the unreached rural poor, which is expected to offer the much needed solution to the twin problems being faced by the banks, viz recovery of loans in the rural areas and the high transaction cost in dealing with small borrowers at frequent intervals. The Group, therefore, felt that the thrust of the policy should be to encourage the formation of SHGs and their linking with the banks and in this regard, the banks have a major role to play. The Working Group had recommended that the banks should treat the linkage programme as a business opportunity and they may design area specific and group specific loan packages taking into account inter alia the potential, local needs, available talent/skills etc.

4. The Reserve Bank constituted four informal groups in October 2002 to examine various issues concerning micro-finance delivery. Linking of SHGs with banks have been emphasized in the Monetary policy of Reserve Bank of India and Union Budget announcements from time to time and various guidelines have been issued to banks in this regard. To scale up the SHGs linkage programme and make it sustainable, banks were advised that they may consider lending to SHGs as part of their mainstream credit operations both at policy and implementation level. They may include SHG linkage in their corporate strategy/plan, training curriculum of their officers and staff and implement it as a regular business activity and monitor and review it periodically.

5. **Separate Segment under priority sector:** In order to enable the banks to report their SHG lending without difficulty, it was decided that the banks should report their lending to SHGs and/or to NGOs for on-lending to SHGs/members of SHGs under the new segment, viz. 'Advances to SHGs' irrespective of the purposes for which the members of SHGs have been disbursed loans. Lending to SHGs should be included by the banks as part of their lending to the weaker sections.

6. **Opening of Savings Bank A/c:** The SHGs registered or unregistered which are engaged in promoting savings habits among their members would be eligible to open savings bank accounts with banks. These SHGs need not necessarily have

already availed of credit facilities from banks before opening savings bank accounts.

7. **SHG lending to be a part of planning process:** Bank lending to SHGs should be included in branch credit plan, block credit plan, district credit plan and state credit plan of each bank. While no target is being prescribed under SHG bank linkage programme, utmost priority should be accorded to the sector in preparation of these plans. It should also form an integral part of the bank's corporate credit plan.

8. **Margin and Security Norms**: As per operational guidelines of NABARD, SHGs may be sanctioned savings linked loans by banks (varying from a saving to loan ratio of 1:1 to 1:4). However, in case of matured SHGs, loans may be given beyond the limit of four times the savings as per the discretion of the bank. Experience showed that group dynamics and peer pressure brought in excellent recovery from members of the SHGS. The flexibility allowed to the banks in respect of margin, security norms, etc. under the pilot project continues to be operational under the linkage programme even beyond the pilot phase.

9. **Documentation:** A simple system requiring minimum procedures and documentation is a precondition for augmenting flow of credit to SHGs. Keeping in view the nature of lending and status of borrowers, banks should strive to remove all operational irritants and make arrangements to expeditiously sanction and disburse credit by delegating adequate sanctioning powers to branch managers. The loan application forms, procedures and documents should be made simple. It would help in providing prompt and hassle-free credit.

10. **Presence of defaulters in SHGs:** The defaults by a few members of SHGs and/or their family members to the financing bank should not ordinarily come in the way of financing SHGs per se by banks provided the SHG is not in default to it. However, the bank loan may not be utilized by the SHG for financing a defaulter member to the bank.

11. **Capacity Building and Training:** An important step in the Linkage Programme would be the training of the field level officials and sensitization of the controlling and other senior officials of the bank. Considering the need and magnitude of training requirements of bank officers/staff both at field level and controlling office level. the banks may initiate suitable steps to internalize the SHGs linkage project and organize exclusive short duration programmes for the field level functionaries. In addition, suitable awareness/sensitization programmes may be conducted for their middle level controlling officers as well as senior officers.

12. **Monitoring and Review of SHG Lending:** Having regard to the potential of the SHGs, banks may have to closely monitor the progress regularly at various levels. In order to give a boost to the ongoing SHG bank linkage programme for credit flow to the unorganized sector, banks were advised in January 2004 that monitoring of SHG bank linkage programme may be made a regular item on the agenda for discussion at the SLBC and DCC meetings. It should be reviewed at the highest corporate level on a quarterly basis. Further the progress of the programme may be reviewed by the banks at regular intervals. A progress report may be sent to NABARD (Micro Credit Innovations Department), Mumbai, on a half-yearly basis, as on 30 September and 31 March each year so as to reach within 30 days of the half-year to which the report relates.

13. **Encourage SHG Linkage:** Banks should provide adequate incentives to their branches in financing the Self Help Groups (SHGs) and establish linkages with them, making the procedures absolutely simple and easy while providing for total flexibility in such procedures to suit local conditions. The group dynamics of working of the SHGs may be left to themselves and need neither be regulated nor formal structures imposed or insisted upon. The approach to financing of SHGs should be totally hassle-free and may include consumption expenditures.

14. **Interest rates:** The interest rate applicable to loans given by banks to Self Help Groups/member beneficiaries would be left to their discretion.

15. **Total Financial Inclusion and Credit Requirement of SHGs:** Banks have been advised to meet the entire credit requirements of SHG members, as envisaged in the Paragraph 93 of the Union Budget announcement made by the Honourable Finance Minister for the year 2008-09 where in it was stated as under: *"Banks will be encouraged to embrace the concept of Total Financial Inclusion. Government will request all scheduled commercial banks to follow the example set by some public sector banks and meet the entire credit requirements of SHG members, namely, (a) income generation activities, (b) social needs like housing, education, marriage, etc. and (c) debt swapping".*

-------***------

**Appendix**

**List of Circulars consolidated in the Master Circular**

| Sr. No. | Circular No. | Date | Subject |
|---|---|---|---|
| 1. | RPCD.No.Plan.BC.13/PL-09.22/91/92 | July 24.1991 | Improving Access of Rural poor to Banking- Role of Intervening Agencies- Self Help Groups |
| 2. | RPCD No.PL.BC.120/04.09.22/95-96 | April 2,1996 | Linking of Self Help Groups with banks- Working Group on NGOs and SHGs-recommendations –Follow up |
| 3. | DBOD.DIR.BC.11/13.01.08/98 | February 10,1998 | Opening of Savings bank accounts in the name of Self Help Groups(SHGs) |
| 4. | RPCD.PI.BC/12/04.09.22/98-99 | July 24,1998 | Linking of Self Help Groups with Banks |
| 5. | RPCD.No.PLAN.BC.94/04.09.01/98-99 | April 24.1999 | Loans to Micro Credit Organizations- Rates of Interest |
| 6 | RPCD.PL.BC.28/04.09.22/99-2000 | September 30,1999 | Credit delivery through Micro Credit Organizations/ Self Help Groups |
| 7. | RPCD.No.PL.BC.62/04.09.01/99-2000 | February 18,2000 | Micro credit |
| 8. | RPCD.No.Plan BC.42/04.09.22/ 2003-04 | November 03,2003 | Micro Finance |
| 9. | RPCD No.Plan.BC 61/04.09.22/2003-04 | January 09.2004 | Credit flow to the unorganized sector |
| 10. | RBI/385/2004-05,<br>RPCD.No.Plan.BC.84/04.09.22/2004-05 | March 03.2005 | Submitting progress report under micro credit |
| 11. | RBI/2006-07/441<br>RPCD.CO.MFFI.BC.No.103/12.01.01/2006-07 | June 20,2007 | Microfinance-Submission of progress reports |
| 12. | RPCD.MFFI.BC.No.56/12.01.001/2007-08 | April 15,2008 | Total Financial inclusion and Credit Requirement of SHGs. |